**प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, राजुर यांच्या कार्यक्षेत्रातील शासकीय आश्रमशाळा, घाटघर, ता.अकोले, जि.अहमदनगर येथील पाणी पुरवठा योजनेच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत....**

महाराष्ट्र शासन
आदिवासी विकास विभाग,
शासन निर्णय क्रमांक : पापुयो-२०१०/प्र.क्र.२२९/का.१३
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :-२९ जूलै, २०१०.

<u>**वाचा**</u> :- १)आयुक्त, आदिवासी विकास,नाशिक यांचे पत्र क्र.शाआशापापू-१०/प्र.क्र.११७/ का ८ (२), दि.२७.३.२०१०.

२) कार्यकारी अभियंता,घाटघर, उदंचन जलविद्युत प्रकल्प विभाग क्र.३ चोंढे,ता. शहापूर, जि. ठाणे. यांची क्र. घाउजविप्रविक्रं.३/प्रशा.३/१६५१/२०१०, दिनांक ७/६/२०१० व क्र.घाउजविप्रविक्रं.३/प्रशा.३/६०७/२०१०, दिनांक २१/७/२०१० ची पत्रे.

<u>**शासन निर्णय**</u> : आयुक्त, आदिवासी विकास महाराष्ट्र राज्य,नाशिक यांनी त्यांचे दि. २७/३/२०१० च्या पत्रान्वये प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, राजुर यांच्या कार्यक्षेत्रातील शासकीय आश्रमशाळा, घाटघर, ता.अकोले, जि.अहमदनगर येथील पाणी पुरवठा योजनेचे रु.१०,४५,२६९/- इतक्या रकमेचे अंदाजपत्रक प्रशासकीय मान्यता देण्यासाठी शासनास सादर केले आहे.

२. सदर अंदाजपत्रक संबंधित सहायक अभियंता श्रेणी-२ यांनी तयार केले असून प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प,राजुर, मुख्याध्यापक, शासकीय पोस्ट बेसिक आश्रमशाळा, घाटघर उप विभागीय अधिकारी,घाटघर उदंचन जलविद्युत प्रकल्प उप विभाग क्र.३ भंडारदरा व कार्यकारी अभियंता, घाटघर उदंचन जलविद्युत प्रकल्प क्र.३ चोंढे (शहापूर) यांनी साक्षांकित केले आहे.

३. उपरोक्त शासकीय आश्रमशाळेचे अंदाजपत्रक सन २००८-०९ च्या महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांच्या दरसूचीवर आधारित आहे. सदर काम पाणी पुरवठयाचे असून प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, राजुर यांचे कार्यक्षेत्रातील उपरोक्त शाळेच्या पाणी पुरवठयाच्या रु.१०,४५,२६९/- (रुपये दहा लाख पंचेचाळीस हजार दोनशे एकोणसत्तर फक्त) इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

४. मा.उच्च न्यायालय, मुंबई यांनी सु मोटो रिट याचिका क्र.१४२०/२००८ प्रकरणी वेळोवेळी दिलेल्या निर्देशानुसार शासकीय आश्रमशाळांमध्ये चांगल्या सोयीसुविधा पुरविणे आवश्यक आहे. सदर काम सुरु होण्यापूर्वी व काम पूर्ण झाल्यावर त्याचे व्हीडीओ शुटींग करुन त्याची सी.डी.शासनास सादर करण्यात यावी.

५. सदर पाणी पुरवठा योजनेचा खर्च सन २०१०-११ या वर्षाकरिता मंजूर असलेल्या तरतूदीमधून भागविण्यात यावा.

६. शासन निर्णय, वित्त विभाग क्र.विअप्र-१०.०८/प्र.क्र.७०/२००८/विनियम, दिनांक १५ मे, २००९ मधील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८, भाग-पहिला, उपविभाग-पाच मधील अ.क्र.१ व सा.बां.विभाग नियम पुस्तिकेतील परिच्छेद १३४ नुसार प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यांत आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक **२०१००७२९१८४०१२००१** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

( ला.रा.गुजर )
अवर सचिव

**प्रति,**

आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
अपर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे.
अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, ठाणे.
प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, राजुर.
महालेखापाल (लेखा परिक्षा), (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई.
महालेखापाल (लेखा परिक्षा), (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, नागपूर.
जिल्हा कोषागार अधिकारी, ठाणे.
कार्यकारी अभियंता, घाटघर उदंचन जलविद्युत प्रकल्प क्र.३ चोंढे (शहापूर)
उपविभागीय अभियंता, , घाटघर उदंचन जलविद्युत प्रकल्प क्र.३ भंडारदरा.
कक्ष अधिकारी (का.६), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
निवड नस्ती (का.१३), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२